<u>राज्य क्षेत्रातील योजना</u>

**मौजे दापोली नळ पाणी पुरवठा योजना, तालुका दापोली, जिल्हा रत्नागिरी या योजनेच्या अंदाजपत्रकास व आराखडयास <u>पुन:पुनर्सुधारित प्रशासकीय मान्यता.</u>**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र. ग्रापापु-१३०९/प्र. क्र.१२६/पापु-०६,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ३० सप्टेंबर,२०१०.**

**वाचा :-** १. शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक : ववेका -(किगका) १०९६ / सी.आर.-२०२ (अ)/पापु-१०, दि. १४/३/१९९६.
२. शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक : ववेका - १०९८/ प्र.क्र.४८० (अ)/पापु-१०, दि. २८/९/१९९८.
३. शासन निर्णय,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्रमांक : ग्रापापु १३०६/प्र.क्र.४८/ पापु-०६, दि. १६/२/२००८
४. कार्यकारी अभियंता,म.जी.प्रा.बां.विभाग,रत्नागिरी यांचे पत्र क्र.मजीप्राबांविर/तांशा/ खेड/१८७२/२००९, दि.१८/११/२००९
५. कार्यकारी अभियंता,म.जी.प्रा.बां.विभाग,रत्नागिरी यांचे पत्र क्र.मजीप्राबांविर/तांशा/ दापोली/३१२/२०१०, दि.१६/२/२०१०

**<u>प्रस्तावना:-</u>** मौजे दापोली नळ पाणी पुरवठा योजना, तालुका दापोली, जिल्हा रत्नागिरी या ग्रामीण नळपाणी पुरवठा योजनेच्या रु.२१.७६ लाख ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत, संदर्भीय शासन निर्णय क्र.१ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तद्नंतर रु.३५.२० लाख ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास वर्धित वेग कार्यक्रमांतर्गत, संदर्भीय शासन निर्णय क्र.२ अन्वये सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. शासन निर्णय क्र.३ अन्वये रु.५१.५३ लक्ष पुनर्सुधारित अंदाजपत्रकास मंजूरी देण्यात आली आहे. तथापि, काही अपरिहार्य कारणांमुळे योजनेच्या खर्चात वाढ झाली. त्यामुळे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, रत्नागिरी यांच्याकडून संदर्भिय पत्र क्र.४ व ५ अन्वये प्राप्त झालेल्या पत्रान्वये मौजे दापोली नळ पाणी पुरवठा योजना, तालुका दापोली, जिल्हा रत्नागिरी या योजनेला पुन:पुनर्सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय</u>** :- वरील प्रस्तावानुसार मौजे दापोली नळ पाणी पुरवठा योजना, तालुका दापोली, जिल्हा रत्नागिरी या नळपाणी पुरवठा योजनेच्या **रुपये ७६.०५ लक्ष (शहात्तर लक्ष पाच हजार**

**फक्त) इतक्या** पुन:पुनर्सुधारित अंदाजपत्रकास या शासन निर्णयान्वये मंजुरी प्रदान करण्यात येत आहे. या पुन:पुनर्सुधारित योजनेच्या वर्धित वेग व महाजल मधील खर्चाची विगतवारी सहपत्र-१ प्रमाणे राहील.

२. या योजनेच्या मुळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या शासन निर्णयात तसेच वर नमुद केलेल्या अ.क्र.२ व ३ येथील शासन निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत व ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्याचे काटेकोरपणे पालन करण्यांत यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती एकाच महसूली गावासाठी असल्याने ती संबंधीत ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधीत कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हापरिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हापरिषद संबधित ग्रामपंचायतीच्या अधिकाऱ्यांनी संयुक्तपणे पहाणी आयोजित करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) याचा दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवी करणे, निधीसाठी किंवा योजनांच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम,१९६० मधील तरतदींनुसार आकारण्यात येणाऱ्या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल हे पाहण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची/जिल्हापरिषदेची राहील. त्या अनुषंगाने या योजनेकरीता पाणीपट्टी ग्रामपंचायत आकारेल. ग्रामपंचायतीने तशा आशयाचा ठराव केल्याशिवाय योजनेची उर्वरीत कामे हाती घेवू नये.

५. वर नमूद केल्याप्रमाणे योजना स्वयंसंतुलित होण्यासाठी पाणीपट्टी दरात उचित वाढ करणे व उक्त योजना **रु.७६.०५ लक्ष** इतक्या किंमतीत पुर्ण करुन ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस हस्तांतरीत करण्याच्या अटीवर मान्यता देण्यात येत आहे.

६. या योजनेवर होणारा किमान गरजा/महाजल या लेख्याशिर्षाखालील खर्च राज्य/जिल्हा नियोजन मंडळ यांचेकडून उपलब्ध करुन घेण्यात यावा.

७. हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२८२/व्यय-३, दि.२०/८/२०१० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा **संगणक सांकेतांक** २०१००९०८१८१२४५००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Sd/-
**( फु.स.मेश्राम )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१.
विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
जिल्हाधिकारी, रत्नागिरी.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रत्नागिरी.
मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, कोकण विभाग, ठाणे,
वित्तीय सल्लागार व मुख्या लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
सदस्य सचिव (छोटा गट) तथा अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, रत्नागिरी.
संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, महाराष्ट्र शासन, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, रत्नागिरी.
वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, रत्नागिरी.
अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, रायगड, नवीन पनवेल
कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, रत्नागिरी.
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, रत्नागिरी.
महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१/२,मुंबई/नागपूर.
महालेखापाल, लेखापरीक्षा , महाराष्ट्र १/२/मुंबई/नागपूर.
ग्रंथपाल, ग्रंथालय, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रती)
वित्त विभाग (व्यय-३), मंत्रालय, मुंबई.
नियोजन विभाग.(कार्यासन-१४४३),मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव.
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहाय्यक,
मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई ,
निवडनस्ती कार्यासन पापु-०६
.

# सहपत्र

**शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ग्रापापु-१३०९/प्र.क्र.१२६/पापु-०६,**
**दि. ३० सप्टेंबर,२०१० सोबतचे प्रपत्र**

| योजनेचे नांव | वर्धित वेग /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत योजनेची मुळ मंजुर किंमत (शा.नि.क्र. ववेका(किगका)/१०९६ / सी.आर.-२०२ (अ)/पापु-१०, दि. १४/३/१९९६ | किमान गरजा योजनेची सुधारित किंमत (शा.नि.क्र.ववेका १०९८/प्र.क्र.४८०/(अ)/पापु-१०,दि.२८/९/१९९८ | किमान गरजा योजनेची पुनर्सुधारित किंमत (शा.नि.क्र.ग्रापापु-१३०६/ | महाजल खाली (राज्य/वित्तीय नियोजन मंडळाकडून) उपलब्ध तरतूद | योजनेची पुन:पुर्नसुधारित किंमत | एकूण वाढीव खर्च |
|---|---|---|---|---|---|---|
| पुर्नसुधारित मौजे दापोली नळ पाणी पुरवठा योजना. | २१.७६ | ३५.२० | ५१.५३ | २४.५२ | ७६.०५ | २४.५२ |

Sd/-
**( फु. स. मेश्राम )**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन.**